**डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ व्या जयंती वर्षानिमित्त पिपल्स एज्युकेशन सोसायटी, नागसेनवन, औरंगाबाद या संस्थेच्या औरंगाबाद येथील डॉ.बाबासाहेब आंबेडकर विधी महाविद्यालयाच्या दुरूस्तीच्या कामासाठी निधी उपलब्ध करून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : सान्यावि-२०१९/प्र.क्र.१४८/बांधकामे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २७ फेब्रुवारी, २०२०

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. सान्यावि-२०१५/प्र.क्र. १६३/बांधकामे, दि. ९.१०.२०१५

२) विभागाचे पत्र क्र. बैठक-२०१९/प्र.क्र.७३/बांधकामे, दि. ८/३/२०१९ रोजीच्या पत्रा सोबतचे दि.२१/२/२०१९ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त

३) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. सकआ/ मावक/पिएसोओ/ ऐति.स्थळ/२०१८-१९/का-१२/७२७३, दिनांक २०/९/२०१८.

**प्रस्तावना :-**

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेल्या कार्यक्रमातील भाग-१ मधील अनुक्रमांक ६ अनुसार डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या जीवनाशी निगडीत असलेल्या स्थळांचा विकास करणे, अनुसूचित जाती व नवबौध्द घटकासाठभ ऐतिहासिक स सांस्कृतिकदृष्ट्या महत्व असलेल्या स्थळांचा विकास करणे या अंतर्गत मा.मंत्री (सा.न्या. व वि.स.) महोदयांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीच्या दि.२१.०२.२०१९ रोजी झालेल्या बैठकीमध्ये एज्युकेशन सोसायटी नागसेनवन, औरंगाबाद येथील डॉ.बाबासाहेब आंबेडकर विधी महाविद्यालयाच्या दुरूस्तीच्या कामासाठी निधी उपलब्ध करून देणेबाबतचा प्रस्तावास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क.३ अन्वये आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी सदरहू कामाचा रू.२,३६,२५,२८३/- (अक्षरी रूपये दोन कोटी छत्तीस लक्ष पंचवीस हजार दोनशे त्र्याऐंशी फक्त इतक्या रकमेचा प्रस्ताव मान्यतेसाठी शासनास सादर केला आहे. सदर कामाचे अंदाजपत्रक सहायक अभियंता (वर्ग-१) बांधकाम उपविभाग क्र.४, औरंगाबाद यांनी तयार केले असून कार्यकारी अभियता, सार्वजनिक बांधकाम विभाग,औरंगाबाद, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद तसेच प्राचार्य, डॉ.बाबासाहेब आंबेडकर विधी महाविद्यालय, औरंगाबाद यांनी साक्षांकित केले आहे. सदर अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय (खुद्द) मुंबई यांनी परिगणीत केल्यानुसार रू.२,२५,७३,५४९/- (अक्षरी रूपये दोन कोटी पंचवीस लक्ष त्र्याहत्तर हजार पाचशे एकोणपन्नास फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंतीनिमित्त पिपल्स एज्युकेशन सोसायटी, नागसेनवन, औरंगाबाद येथील डॉ.बाबासाहेब आंबेडकर विधी महाविद्यालयाच्या दुरूस्तीच्या कामासाठी निधी उपलब्ध करून देणे इत्यादी कामास सार्वजनिक बांधकाम विभागाने परिगणीत केल्यानुसार रू.२,२५,७३,५४९/- ( अक्षरी रूपये दोन कोटी पंचवीस लक्ष त्र्याहत्तर हजार पाचशे एकोणपन्नास फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अ)** सदर काम सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करण्यात यावे.

**आ)** काम सुरू करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरू करावे

**इ)** ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करून काम हाती घ्यावे.

**ई)** प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/तां.क.१. दि. १० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

**उ)** सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/ इमारती-२, दि.७/७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

३. यावर होणारा खर्च मागणी क्र. एन-३, मुख्य लेखाशिर्ष २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१, अनुसूचित जातीचे कल्याण,७८९- अनुसूचित जाती घटक योजना, ०२- भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ वी जयंती साजरी करणे, (योजनांतर्गत-दत्तमत) लेखाशिर्ष- २२२५ डी८२३ या लेखाशिर्षाखाली खर्ची घालून तो सन २०१९-२० या वित्तीय वर्षात करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. या करीता आयुक्त,समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांनी या कामासाठीचा निधी, वित्त विभागाने हिहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार त्या त्या टप्प्यावर सदरहू कामाकरीता वितरीत करावा.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय, दि.९/१०/२०१५ च्या शासन निर्णयान्वये गठित समितीस प्राप्त अधिकार तसेच वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२२८१६१०३७३७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, serialNumber=fd9b93035f4da174c04fa71634fe1f6aa493c78a5335f985651f937888df7a89, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2020.02.28 16:14:46 +05'30'

**(अ. कों. आहिरे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा.मंत्री (सा.न्या.) महोदयांचे खाजगी सचिव
२) मा. राज्यमंत्री (सा.न्या.) महोदयांचे खाजगी सचिव
३) आयुक्तपुणे ,समाजकल्याण ,
४) उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
५) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद.
६) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद.
७) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद.
८) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
९) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग,औरंगाबाद.
१०) सहायक आयुक्त, समाजकल्याण, औरंगाबाद.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/ पुणे.
१२) निवडनस्ती.